**लक्ष्यनिर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत धान्य उपलब्धतेच्या हमीकरिता निश्चित केलेल्या सुधारीत धान्य वितरण पध्दतीनुसार अन्नधान्य व इतर जीवनावश्यक वस्तूंचे वाहतूक कंत्राट निश्चित करण्याबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : कंत्राट १०१६/ प्र.क्र.१६९/ ना.पु.१६-अ,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २६ मे, २०१७

<u>वाचा:</u>- १) शासन निर्णय क्र.कंत्राट १०१६/ प्र.क्र.१६९/ ना.पु.१६-अ, दि. २० एप्रिल, २०१७.

**शासन शुद्धीपत्रक :-**

संदर्भाधिन शासन निर्णयातील,

**परिच्छेद क्र. ३**

<u>मुद्दा क्र.३.२.२</u> : इसाऱ्याची रक्कम ऑनलाईन/ धनाकर्ष रुपात भरण्यात यावी.

ऐवजी

"इसाऱ्याची रक्कम ऑनलाईन पद्धतीने भरण्यात यावी" असे वाचावे.

**परिच्छेद क्र. ५**

<u>मुद्दा क्र.५.१२</u> : निविदा कालावधीच्या अंतिम दिनांकापर्यंत ३ पेक्षा कमी निविदाकार सहभागी झाल्याचे दिसून आल्यास किंवा तांत्रिकदृष्ट्या कमी पात्र निविदा प्राप्त झाल्यास निविदा प्रक्रियेस किमान ०७ दिवसांची पहिली मुदतवाढ देण्यात यावी. यावेळीही ३ पेक्षा कमी ग्राह्य निविदा प्राप्त झाल्यास, निविदा सादर करण्यास पुन्हा ०७ दिवसांची दुसरी मुदतवाढ देण्यात यावी.

ऐवजी

"निविदा कालावधीच्या अंतिम दिनांकापर्यंत ३ पेक्षा कमी निविदाकार सहभागी झाल्याचे दिसून आल्यास निविदा प्रक्रियेस किमान ०७ दिवसांची पहिली मुदतवाढ देण्यात यावी. यावेळीही ३ पेक्षा कमी निविदा प्राप्त झाल्यास, निविदा सादर करण्यास पुन्हा ०७ दिवसांची दुसरी मुदतवाढ देण्यात यावी. प्रथम निविदेअंती किंवा मुदतवाढीनंतरही तांत्रिकदृष्ट्या ३ पेक्षा कमी पात्र निविदा प्राप्त झाल्यास फेरनिविदा मागविण्यात यावी" असे वाचावे.

**परिच्छेद क्र.१६**

<u>मुद्दा क्र.१६.६</u> : घाऊक किंमत निर्देशांकानुसार प्रमाणशीर दरवाढ / दरघट खालीलप्रमाणे परिगणित करण्यात यावी.

दरवाढ/ दरघट = १६.५ नुसार WPI - १६.४ नुसारWPI x १०० = क्ष टक्के

ऐवजी

घाऊक किंमत निर्देशांकानुसार प्रमाणशीर दरवाढ / दरघट खालीलप्रमाणे परिगणित करण्यात यावी.

$$\text{दरवाढ / दरघट} = \frac{\text{१६.५ नुसार WPI - १६.४ नुसारWPI}}{\text{१६.४ नुसारWPI}} \times १०० = \text{क्ष टक्के}$$

उदा. एका जिल्ह्यात निविदेअंती आधारभूत दरावर एप्रिल, २०१६ या महिन्यात कंत्राट निश्चित झाले असल्यास सदर कंत्राटदारास घाऊक किंमत निर्देशांकानुसार प्रमाणशीर दरवाढ/ दरघट माहे एप्रिल, २०१७ पासून लागू होईल. त्याची परिगणना खालीलप्रमाणे करावी.

अ) एप्रिल, २०१६ मध्ये WPI (All Commodities) १०९ असेल.

ब) एप्रिल, २०१७ मध्ये WPI (All Commodities) वाढ होऊन ११३.२ असेल.

$$\text{क) दरवाढ} = \frac{\text{ब) WPI - अ) WPI}}{\text{अ) WPI}} \times १००$$

$$= \frac{११३.२० - १०९.००}{१०९.००} \times १००$$

$$= ३.८५ \%$$

अशा प्रकारे एप्रिल, २०१७ पासून वाहतूक कंत्राटदारास निविदेअंती मंजूर दराच्या ३.८५ % दरवाढ देण्यात यावी.

पुढील दरवाढ एप्रिल, २०१८ मध्ये लागू राहील. WPI मध्ये घट झाली असल्यास उपरोक्त सुत्रानुसार परिगणनेअंती वजा टक्केवारी प्राप्त होईल. त्याप्रमाणात दरघट करण्यात यावी.

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५२६११२९०१२७०६ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2017.05.26 11:50:56 +05'30'

( सतिश सुपे )
उप सचिव

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री , अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
४. मा. विधानसभा / परिषद सदस्य
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय , मुंबई.
६. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

७. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
८. सर्व प्रशासकीय विभाग प्रमुख, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
१२. सर्व उपायुक्त (पुरवठा)
१३. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१४. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई
१७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- २, नागपूर
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर
१९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ
द्वारा- वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२०. वित्त विभाग, व्यय- ४, मंत्रालय, मुंबई
२१. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, उद्योग- ४, मंत्रालय, मुंबई
२२. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
२३. सर्व उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२४. निवड नस्ती (कार्यासन ना. पु.१६- अ).